वितरण आदेश क्र.८
सन २०२०-२०२१

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,
नाथनगर, (उत्तर), पैठण, जिल्हा - औरंगाबाद
सहाय्यक अनुदान २०२०-२०२१ (अनिवार्य) (अंतिम हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२०/प्र.क्र.६१ /२०/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. २४ नोव्हेंबर, २०२०

<u>वाचा :</u> १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/अर्थसंकल्प ३, दि.१६ एप्रिल, २०२०.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१९/ प्र.क्र.९६ /२५, दि.२० एप्रिल, २०२०
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण -२०२०/प्रक्र.६२/कोषा प्रशा-५ दि.१ एप्रिल, २०२० व
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण -२०२०/प्रक्र.६२/कोषा प्रशा-५ दि.२२ एप्रिल, २०२०
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. - मप्रप्र-२०२०/ प्र.क्र.६१ /२५, दि.२४ एप्रिल, २०२०
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - मप्रप्र-२०२० / प्र.क्र.६१ /१२-अ, दि. २४ एप्रिल, २०२०
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण -२०२०/प्रक्र.६७/कोषा प्रशा-५ दि.२८ मे, २०२०
८. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - मप्रप्र-२०२० / प्र.क्र.६१ /१२-अ, दि.१० जुन, २०२०
९. संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद यांचे क्र.२०२०/मप्रविप्रप्र/ लेखा अनुदान/कावि-२१८ दि.२०.८.२०२०
१०. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - मप्रप्र-२०२० / प्र.क्र.६१ /१२-अ, दि.२९ सप्टेंबर, २०२०
११. निबंधक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद यांचे क्र.२०२०/मप्रविप्रप्र/ लेखा अनुदान/कावि-३१५ दि.२९.१०.२०२०

**शासन निर्णय :-**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.१४.८५ लाख व वेतने रु.१००.०० लाख अशी एकूण रु. ११४.८५ लाख (अक्षरी रुपये एकशे चौदा लाख, पंच्याऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद करण्यात आली असून, त्यापैकी रु. १०.०० लाख (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) एवढे अनुदान एप्रिल ते जुन २०२० या तीन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी संदर्भाधीन क्र.५ च्या शासन परिपत्रकान्वये मंजूर करण्यात आले होते. आता अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने एकूण ७० % च्या मर्यादेत अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. त्यास अधिन राहून मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद या संस्थेला संदर्भाधीन क्र.६ च्या शासन निर्णयान्वये विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल ते जून २०२० या तीन महिन्यांकरिता अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने एकूण १० % च्या मर्यादेत ३६ सहायक अनुदान ( वेतने ) करिता रु.१०.०० लाख इतका निधी ( अक्षरी रुपये दहा लाख फक्त) ( पहिला हप्ता) व वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या २५ % च्या मर्यादेत, संदर्भाधीन क्र. ८ च्या शासन निर्णयान्वये रु.१५.०० लाख इतका निधी ( अक्षरी रुपये पंधरा लाख फक्त) अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान ( वेतने) ( दुसरा हप्ता ) म्हणून वितरित करण्यात आला आहे.

त्यानंतर संदर्भाधीन क्र. १० च्या शासन निर्णयान्वये संस्थेंस एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ३५% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या अनिवार्य खर्चासाठी रु.१०.०० लाख इतका निधी ( अक्षरी रुपये दहा लाख फक्त ) इतके ३६ सहाय्यक अनुदान ( वेतने ) ( तिसरा हप्ता ) म्हणून वितरित करण्यात आला आहे. त्यानुसार संस्थेस आतापर्यंत एकूण रु.३५.०० लाख इतका निधी अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान ( वेतने ) म्हणून वितरित करण्यात आला आहे.

३. आता संस्थेंस एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ७०% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या अनिवार्य खर्चासाठी रु.२०.०० लाख ( अक्षरी रुपये वीस लाख फक्त ) इतका निधी ३६ सहाय्यक अनुदान ( वेतने ) (अतिम हप्ता ) म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

४. हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य ) ( २०७० ०७४६ ) याखाली सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु.२०.०० लाख ( रुपये वीस लाख, फक्त ) याप्रमाणे भागविण्यात यावा..

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच लेखाशीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आर्थिक वर्ष २०२०-२०२१ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

७. त्याचप्रमाणे, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ व ४ च्या शासन परिपत्रकातील नमूद आदेशानुसार वेतन आहरित करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

८. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

९. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.६ मध्ये नमूद केल्यानुसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करतांना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट Bank Account Statement ) देयकासोबत जोडण्यात यावे.

११. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ येथील शासन परिपत्रकातील परिच्छेद २ नुसार कार्यवाही करावी.

१२.     सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि१.४.२०२० परिपत्रकातील परिच्छेद ६ व ७ मधील अटींच्या अधीन राहून व वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग एक, अनु.क्र. २७, परिच्छेद क्र १४९.नुसार व सदर अधिकारातील रकाना क्र ६.खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११२४१२५७३२९४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, serialNumber=31493d4a6291f531ed8fd00972ccbfa0376623c7f6c38c3b848bfbe06685a219, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2020.11.24 13:04:29 +05'30'

( राहुल कुलकर्णी )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति:-

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर, पैठण, औरंगाबाद.
४) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर पैठण, औरंगाबाद
५) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
७) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.
८) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१०) मा. अ.मु. स.(सेवा), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)